**मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ च्या अनुसूची “डब्ल्यू” मधील मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांना भाडेपट्टा कराराने दिलेल्या शासकीय भूखंडावरील अनुज्ञेय होणाऱ्या भाडेपट्याच्या आकारणीच्या दरामध्ये सुधारणा करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांक-बीएमसी-२५२४/प्र.क्र.८१(भाग-२)/नवि-२१**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २६ जून, २०२४.

**संदर्भ:-**
१. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.जमीन-२५१२/०८/प्र.क्र.५१/ज-२, दिनांक २३.०६.२०१७
२. शासन निर्णय, नगरविकास विभाग, क्र. बीएमसी-२५१६/प्र.क्र.२८०/नवि-२१, दि.१५.०३.२०१७.
३. शासन निर्णय, नगरविकास विभाग, क्र.बीएमसी-२५२४/प्र.क्र.८१(भाग-१ व भाग-२)/ नवि-२१, दि.१४.०३.२०२४ व समक्रमांकाचे शासन शुध्दीपत्रक दि.१५.०३.२०२४.
४. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका यांचे क्र.एमजीसी/एफ/३५६१, दि.१३.०६.२०२४ व दि.२०.०६.२०२४ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना:-**

मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ मधील अनुसूची “डब्ल्यू” मधील मालमत्तांच्या नुतनीकरणाबाबत संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णय, नगरविकास विभाग दि.१५.०३.२०१७ अन्वये धोरण निश्चित करण्यात आलेले होते. यामध्ये महालक्ष्मी रेसकोर्स, विविध जिमखाने व तत्सम भूभाग या मालमत्तांचे नुतनीकरण हे शासनाच्या मान्यतेने करण्यात येईल, तसेच, नुतनीकरण करण्यासाठी भाडेपट्टयाच्या रकमेचे दर, त्याची आकारणी, परिगणना याबाबतचे आदेश स्वतंत्रपणे काढण्यात येतील, असे नमूद करण्यात आले. त्यानुसार, संदर्भाधीन क्र.३ येथील दि.१४.०३.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये व दि.१५.०३.२०२४ रोजीच्या शासन शुध्दीपत्रकांन्वये मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ च्या अनुसूची “डब्ल्यू” मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या महालक्ष्मी रेसकोर्स, विविध जिमखाने व तत्सम भूभागांच्या भाडेपट्ट्याचे नुतनीकरण करण्याबाबतचे धोरण/नियम निश्चित करण्यात आले आहे.

यानुसार, मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांना महालक्ष्मी रेसकोर्स येथील एकूण २११ एकर भूखंडापैकी अंदाजे ९१ एकर शासकीय भूखंडाच्या भाडेपट्याचे दि.०१.०६.२०२३ पासून ते दि. ३१.०५.२०५३ या ३० वर्षाच्या महत्तम कालावधीसाठी नुतनीकरण करण्यास अटी व शर्तीसह मान्यता देण्यात आली आहे. याद्वारे, मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांना यापुर्वी देण्यात आलेल्या २११ एकर भुखंडापैकी अंदाजे ९१ एकर भुखंड ३० वर्षाच्या भाडेपट्याने देण्यात आला आहे.

मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांना भाडेपट्टा कराराने दिलेल्या शासकीय भूखंडावरील अनुज्ञेय होणाऱ्या भाडेपट्याची आकारणी व वसुलीच्या दरामध्ये सुधारणा करणेबाबत मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लिमिटेड यांनी बृहन्मुंबई महानगरपालिकेकडे विनंती केली. त्यानुसार, बृहन्मुंबई महानगरपालिकेने संदर्भाधीन क्र.४ येथील पत्रान्वये याबाबतचा प्रस्ताव शासनास मान्यतेसाठी सादर केला आहे. या अनुषंगाने मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांना देण्यात आलेल्या भुखंडावरील भाडेपट्याच्या आकारणी व वसुलीच्या दरामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांनी बृहन्मुंबई महानगरपालिकेस केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने महानगरपालिकेने शासनास सादर केलेल्या प्रस्तावाबाबत दि.२६.०६.२०२४ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीत प्राप्त मंजुरीस अनुसरुन मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांना देण्यात आलेल्या भुखंडावरील भाडेपट्याच्या आकारणी व वसुलीच्या दरामध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यास मान्यता देण्यात आली आहे. यानुसार

१. मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांना भाडेपट्टा कराराने देण्यात आलेल्या महालक्ष्मी रेसकोर्स येथील शासकीय भूखंडावर दि.०१.०१.२०१७ ते दि.३१.१२.२०२३ या कालावधीकरीता अतिरिक्त भाडेपट्ट्यापोटी अनुज्ञेय होणाऱ्या फरकाची रक्कम वसूल करण्यात येवू नये.

२. भाडेपट्टा कराराने दिलेल्या भूखंडावर मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांचेद्वारे आयोजित करण्यात येणाऱ्या सर्व क्रिडेतर कार्यक्रमाकरिता प्रतीदिन आकारावयाचे अनुज्ञप्ती शुल्क (License Fee) हे शासन निर्णय, महसूल व वन विभाग, दि.२३.०६.२०१७ अन्वये विहित केलेल्या धोरणातील मुद्दा क्र.२ ब, २ (ii) नुसार क्रिडेत्तर कार्यक्रमाच्या पहिल्या दिवसासाठी रु.१,५०,०००/- प्रती कार्यक्रम व एकाच आयोजकाचा तोच कार्यक्रम एकापेक्षा अधिक कालावधीसाठी असेल तर लगतच्या प्रत्येक दिवसासाठी रु.१,००,०००/- प्रती कार्यक्रम प्रती दिन या प्रमाणे आकारण्यात यावे.

३. (अ) मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांच्या क्लब, स्टेबल्स आणि इतर संरचनांनी व्यापलेल्या बांधीव क्षेत्राकरीता दि.१४.०३.२०२४ रोजी निर्गमित शासन निर्णयामध्ये स्पष्ट केल्यानुसार जमिनींच्या वार्षिक मुल्य दर तक्त्यातील (रेडीरेकनरने येणाऱ्या) किंमतीच्या १०% रकमेवर १% या प्रचलित दराने भाडेपट्टा आकारणी करण्यात यावी.

(ब) उर्वरित मोकळी जागा अश्व शर्यतीच्या दिवसांव्यतीरिक्त इतर दिवसांकरिता सार्वजनिक वापराकरिता उपलब्ध राहणार असल्याने या जागेवर सवलतीच्या दराने भाडेपट्टा आकारण्यात यावा.

(क) मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांचेवर दरवर्षी आकारण्यात येणारी दरवाढ ही ३ % पेक्षा जास्त असू नये.

४. मे.रॉयल वेस्टर्न इंडिया टर्फ क्लब लि. यांच्याकडून परत घेण्यात आलेल्या जागेवर कोणत्याही स्वरुपाचे व्यवसायीक / व्यापारी बांधकाम करण्यात येवू नये. सदर जागेचा वापर सार्वजनिक वापराकरिता आंतरराष्ट्रीय दर्जाचे सेंट्रल पब्लीक पार्क विकसित करण्याकरिता करण्यात यावा.

५. या शासन निर्णयात नमूद बाबींव्यतिरिक्त इतर सर्व बाबींसाठी संदर्भाधीन क्र.३ मध्ये नमूद शासन निर्णय व शुध्दीपत्र यांमधील इतर तरतूदी, अटी व शर्ती लागू राहतील.

६. सदर शासन निर्णय, महसूल व वन विभाग, वित्त विभाग आणि विधी व न्याय विभाग यांनी दिलेले अभिप्राय विचारात घेवून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०६२६१८३३४०३२२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2024.06.26 20:19:49 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**शासनाच्या उप सचिव**

**प्रत- तातडीच्या आवश्यक कार्यवाहीकरिता**

आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.

**प्रत माहितीस्तव-**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव , राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उप मुख्यमंत्री (गृह व विधी व न्याय) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.सभापती, विधान परिषद/ मा.अध्यक्ष, विधानसभा,
६. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा.
७. मा.सर्व विधानसभा आणि विधान परिषद सदस्य
८. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
११. जिल्हाधिकारी, मुंबई शहर, मुंबई.
१२. निवडनस्ती(कार्या-नवि-२१).